**सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेऊन विवाह करणाऱ्या विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील नवविवाहित दांपत्यांसाठी वित्तीय सहाय्य "कन्यादान" योजना (२२२५ ई ८३९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत तरतूद वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सावियो-२०२४/प्र.क्र.२२/योजना-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ०४ मार्च, २०२५

**संदर्भ :-** १) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय, क्र.सावियो-२०१८/प्र.क्र.११०/अर्थसं, दिनांक ०२.०२.२०१९

२) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन शुध्दिपत्रक, क्र.सावियो-२०१८/प्र.क्र.११०/अर्थसं. दिनांक ०४.०५.२०१९

३) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.१०/अर्थसंकल्प, दिनांक १०.०२.२०२२

४) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. इमाबकसं/मावक/कन्यादान प्रस्ताव/निधी मागणी/२०२४-२५/पुणे/४२७९, दिनांक ०५.१२.२०२४

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. १ येथील विभागाच्या शासन निर्णयान्वये सामुहिक विवाह सोहळयामध्ये भाग घेऊन विवाह करणाऱ्या विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील नवविवाहित दांपत्यांसाठी अर्थसहाय्य असलेली "कन्यादान योजना" या विभागामार्फत सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासून राबविण्यात येत आहे. त्यानुसार वीरशैव लिंगायत गवळी समाज ट्रस्ट, जि. अहिल्यानगर या संस्थेने दिनांक १६.०५.२०२३ रोजी आयोजित केलेल्या सामुहिक विवाह सोहळयातील एकूण ११ पात्र लाभार्थ्यांना आर्थिक सहाय्य व संबंधित संस्थेस प्रोत्साहनात्मक भत्ता देण्यासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना रु. २,६४,०००/- (अक्षरी रक्कम रुपये दोन लाख चौसष्ट हजार फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा निधी वितरीत करण्याकरीता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" व संबंधित प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून संदर्भ क्र. ३ येथील शासन परिपत्रकान्वये घोषित करण्यात आलेले आहे.

३. संबंधित प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग यांनी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती आणि संदर्भ क्र.२ येथील शुध्दीपत्रकान्वये व्यक्ती व स्वयंसेवी संस्थांसाठी लागू करण्यात आलेल्या निकषांची पूर्तता होत असल्याची खात्री करुन अनुज्ञेय रक्कम लाभार्थ्यांस अदा करावी.

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडजी-०३, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,०३ मागासवर्गीयांचे कल्याण, १०२ आर्थिक विकास, (०१)विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग यांचे कल्याण (०१)(०४) "कन्यादान योजनेखाली नवदांपत्यांना अर्थसहाय्य (२२२५ ई ८३९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदरचा निधी अदा करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय व परिपत्रकांतील नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्ती लागू राहतील.

६. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

७. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचे "उपयोगिता प्रमाणपत्र" (Utilisation Certificate) त्यांनी महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर यांना व शासनाला सादर करावे.

८. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११७/२०२५/व्यय-१४, दिनांक ०७.०२.२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३०४१३१८४७६९३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAHIL MAHADEV DHANWADE

Digitally signed by SAHIL MAHADEV DHANWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=393cd08ed02c7d151f264e32cdad83db848ccb3c33d5d6254e4ab7dc8c58b3b1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=080CFC4AB018C3B658C71325006154CA250D25A3B8F476AC4EE4C2BD9C4CD79A, cn=SAHIL MAHADEV DHANWADE
Date: 2025.03.04 13:19:48 +05'30'

**(साहिल म. धनवडे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६. महालेखापाल, महाराष्ट्र - १ / २, (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
८. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
९. सर्व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग.
१०. सर्व सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, अहिल्यानगर.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती (योजना-३).